**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट- अ मधील जिल्हा शल्य चिकीत्सक संवर्गातील बदलीबाबत ..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदस्था-१३१५/प्र.क्र.११६/सेवा २**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल, दहावा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ०७ सप्टेंबर, २०१५

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना डॉ. श्रीमती कल्पना म्हसकर, वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रुग्णालय, कामठी, नागपूर यांच्याविरुध्द मा. लोकप्रतिनिधींची तक्रार प्राप्त झाली होती. सदर तक्रारीच्या अनुषंगाने संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांच्याकडून चौकशी केली असता, त्यामध्ये खालील तथ्ये आढळून आली.

अ) जिल्हा नियोजन मंडळामार्फत मौखिक आरोग्य कार्यक्रम तथा जिल्हा विकास योजनेअंतर्गत औषधी खरेदी संदर्भात देयके कोषागारातून पारित करुन घेण्याचे निर्देश असतानाही सदरची देयके कोषागारातून पारित न करणे

ब ) वैद्यकीय अधीक्षक तथा कार्यालयातील सहायक अधीक्षक कार्यालयात अनुपस्थित असतानाही त्यांना पूर्ण दिवसांचे वेतन अदा करणे.

क) पूर्व सूचना देऊनही वरिष्ठांच्या भेटीच्या वेळी अनुपस्थित रहाणे.

ड) नियोजन लेखा सभेसाठी वरिष्ठ कार्यालयास उपस्थित राहण्याच्या सूचना असतानाही अनुपस्थित राहणे.

इ) आदेश नसताना परस्पर प्रशिक्षणास हजर राहणे.

या संदर्भात संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना चौकशी अहवाल सादर करण्यात आला. त्यानुसार डॉ.म्हसकर यांना प्रशिक्षणास हजर राहण्याबाबत कोणत्याही सूचना वा आदेश नसताना त्या विना परवानगी प्रशिक्षणास हजर राहिल्या. त्यामुळे त्यांच्या अनुपस्थितीत कामठी उपजिल्हा रुग्णालय अंतर्गत झालेल्या अवयस्क मुलीच्या हत्या प्रकरणी करावयाच्या शवविच्छेदनावेळी जबाबदार अधिकारी उपस्थित नसल्याने परिस्थिती गुंतागुतीची झाली व सार्वजनिक क्षोभाच्या परिणामी जमावाकडून अनुचित प्रकार घडण्याची परिस्थिती निर्माण झाली होती. सदर प्रकरणात संवेदनशील रितीने परिस्थिती हाताळणे आवश्यक असताना विना परवानगी अनुपस्थित असल्याचे आढळून आले त्यामुळे गुतांगुतीच्या परिस्थितीस जबाबदार धरुन त्यांच्या विरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाहीची देखील शिफारस करण्यात आली आहे.

डॉ.म्हसकर यांच्या विरुध्द अध्यक्ष, आरोग्य सेवा, लिपीक वर्गीय संघटना नागपूर यांच्याकडून प्राप्त झालेल्या निवेदनाच्या अनुषंगाने कार्यालयातील सहायक अधीक्षक यांची वैद्यकीय रजा नामंजूर करण्याबाबत तसेच अधिक्षिका यांचे भविष्य निर्वाह निधी अग्रीम मंजूर न केल्याने त्यांनी स्वत:च्या अंगावर केरोसीन टाकून आत्मदहनाचा प्रयत्न केला त्याबाबत त्यांच्याकडून खुलासा मागविण्यात आला. तसेच डॉ.म्हसकर यांनी वित्तिय नियमावलीचा भंग केला. या सर्व बाबी लक्षात घेवून संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी डॉ.म्हसकर यांच्या बदलीबाबत शिफारस केली.

**शासन आदेश :**

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी केलेली शिफारस विचारात घेवून, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४)(दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट अ वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ६६०० मधील जिल्हा शल्य चिकीत्सक संवर्गातील डॉ. श्रीमती कल्पना म्हसकर, वैद्यकीय अधीक्षक यांची प्रशासकीय कारणास्तव बदलीने खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | डॉ. कल्पना म्हसकर | वैद्यकीय अधीक्षक, उप जिल्हा रुग्णालय, कामठी | वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रुग्णालय, बल्लारपूर, जि. चंद्रपूर |

संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई व शासनास सादर करावा.

बदली झालेल्या अधिकाऱ्याला कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

बदली झालेल्या अधिकाऱ्याने त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे. या कालमर्यादेचे पालन न झाल्यास आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहिल्यास, अशी अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव करुन देण्यात येत आहे.

संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत. त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०७१८४१०४६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH,CID - 918117, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
Date: 2015.09.08 11:19:15 +05'30'

(वि.पुं.घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई,
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई,
३. उपसंचालक , आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर,
४. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, नागपूर / चंद्रपूर,
५. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / चंद्रपूर,
८. मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक,
९. मा. प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक,
१०. संबंधीत अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचेमार्फत)
११. निवडनस्ती (सेवा-२)